**सह व्यवस्थापकीय संचालक (अभियांत्रिकी),**
**महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई**
**<u>या पदावर करार पध्दतीने नेमणूक.</u>**
**(श्री. अनिलकुमार ब. गायकवाड)**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः संकीर्ण-११२१/प्र.क्र. २१२/सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०२ डिसेंबर, २०२१

<u>संदर्भ</u> :- १. सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र. खाक्षेस-१०९६/प्र.क्र.८०/रस्ते-८, दिनांक ०९/०७/१९९६,
२. सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र. खाक्षेस-१०९६/८०/रस्ते-८, दिनांक २१/०४/१९९९,
३. सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र. खाक्षेस-१०९६/८०(१)/रस्ते-८, दिनांक ०९/०२/२०००,
४. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२७१५/प्र.क्र.१००/१३, दिनांक १७/१२/२०१६,
५. सामान्य प्रशासन विभाग शासन शुध्दीपत्रक क्र.संकीर्ण-२७१५/प्र.क्र.१००/१३, दिनांक २१/०२/२०१८.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाची स्थापना जुलै, १९९६ मध्ये करण्यात आली आहे व दिनांक २९/११/१९९६ च्या शासन निर्णयान्वये महामंडळाची उद्दिष्टे, रचना व उत्पन्नाची प्रमुख साधने या बाबत पुनर्विचार करण्यात आला. त्यानुसार महामंडळाच्या संचालक मंडळाच्या रचनेत सुधारणा करण्यात आली. त्यानंतर संदर्भ क्र. २ व ३ नुसार अनुक्रमे दि. २१/०४/१९९९ व दि. ०९/०२/२००० च्या शासन निर्णयान्वये महामंडळाच्या संचालक मंडळाची पुनर्रचना करण्यात आली आहे.

२. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळामार्फत राबविण्यात येणारा हिंदुहृदयसम्राट बाळासाहेब ठाकरे महाराष्ट्र समृध्दी महामार्ग हा राज्याचा महत्वाकांक्षी प्रकल्प आहे. सदर प्रकल्पाचा पहिला टप्पा नागपूर ते शिर्डी लवकरच वाहतुकीसाठी खुला करण्यात येणार आहे. महामार्गावरील वाहतूक सुरक्षेबाबतची कामे अंतिम टप्प्यात असून दुसऱ्या टप्प्याचे काम पुढील एक वर्षात पूर्ण करुन तो वाहतुकीसाठी खुला करावयाचे नियोजन आहे. सदरचा प्रकल्प नियोजित वेळेत पूर्ण करण्याची निकड विचारात घेवून, श्री. अनिलकुमार बळीराम गायकवाड, सेवानिवृत्त सचिव (बांधकामे) यांची सह व्यवस्थापकीय संचालक (अभियांत्रिकी), महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्या., मुंबई या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून एक वर्षाच्या कालावधीकरिता (दि. १ डिसेंबर, २०२२ पर्यंत) करार पध्दतीने नियुक्ती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. श्री. अ. ब. गायकवाड यांच्या करार पध्दतीने नियुक्तीच्या अनुषंगाने महामंडळाच्या संचालक मंडळाची मान्यता घेण्यात यावी. त्यांच्या सदर नियुक्तीबाबत अटी व शर्ती, त्यांना देय असलेले वेतन व भत्ते (मासिक पारिश्रमिक) तसेच त्यांचे प्रशासकीय व वित्तीय अधिकार निश्चित करणे या बाबतची कार्यवाही सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२७१५/प्र.क्र.१००/१३, दि. १७/१२/२०१६ व शासन शुध्दीपत्रक दि. २१/०२/२०१८ मधील तरतूदीनुसार करण्यात येईल.

४.	सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२०२१७३०४१८६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gangadhar Mahajan Gaikwad

Digitally signed by Gangadhar Mahajan Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0d38ef6405f5cae15731340f134ce56f50e939ba034b962c317c33ce102270d0, serialNumber=5eeead19a0ef3d2434afccb36079e80e7ede5a45017ec3297470e90ae602404b, cn=Gangadhar Mahajan Gaikwad
Date: 2021.12.02 17:32:50 +05'30'

**( गंगाधर म. गायकवाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित, मुंबई,
३. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. महालेखापाल १ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०. सह व्यवस्थापकीय संचालक (प्रशासन), महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित, मुंबई,
११. श्री. अनिलकुमार बळीराम गायकवाड, सचिव (बांधकामे)(सेवानिवृत्त)
१२. मा. मुख्य सचिवांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई,
१३. अपर मुख्य सचिव (सेवा), यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. अपर मुख्य सचिव (सा.बां.), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. सचिव (रस्ते), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. सचिव (बांधकामे), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
१८. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१९. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. सह सचिव, कार्यासन अधिकारी(का.९/का.९ अ/का. १०), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१. सर्व कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२. निवडनस्ती.